**स्थानिक केबल वाहिन्यांवरुन शासकीय संदेशाचे प्रसारण करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मावज-२०१८/प्र.क्र.३३६(१)/का.३४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक - १९ ऑक्टोबर, २०१८

**वाचावे -:**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र. वृत्तचित्र-१८स्थानिक केबल/ का-७/३६ दि. १६.०८.२०१८ चे पत्र

**प्रस्तावना :**

सॅटेलाईटद्वारे प्रक्षेपित होणाऱ्या दुरचित्रवाणी वाहिन्यांपेक्षा स्थानिक केबल वाहिन्यांवर प्रसारीत होणारे कार्यक्रम अधिक प्रभावी असतात. शासनाच्या विविध योजना व महत्वाकांक्षी प्रकल्प यांची माहिती सर्वसामान्य जनतेला होण्यासाठी इतर माध्यमांसोबतच स्थानिक केबल वाहिन्यांवरुनही शासकीय संदेशाचे प्रसारण योजनांची माहिती प्रसारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -:**

शासनाच्या योजनांची माहिती सामान्य जनतेपर्यंत पोहोचविण्यासठी इतर माध्यमांसोबतच स्थानिक केबल वाहिन्यांवरुनही शासकीय संदेशाचे प्रसारण, योजनांची माहिती प्रसारीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

या योजनेची अंमलबजावणी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून करण्यात येईल. या बाबींवर ऑक्टोबर, २०१८ ते मार्च, २०१९ या कालावधीत होणाऱ्या रु.२५,१८,५७०/- (पंचवीस लाख अठरा हजार पाचशे सत्तर) इतक्या रकमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. वरील प्रयोजनासाठी येणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिद्धी ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिद्धी (संगणक सांकेतांक २२२० ११७५) (योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ या आर्थिक वषातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर खर्च करतांना शासनाचे प्रचलित नियम/आदेश कार्यपध्दती इ. चा अवलंब करण्यात यावा.

२. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६७/१८/१४४३, दि.०८/१०/२०१८ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३७४/व्यय-४ दिनांक १२.१०.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२०१५५८३४९९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Ramkisan
Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e6132 09e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2018.10.20 16:08:22 +05'30'

**(रा.ना.मुसळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संचालक(माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२. सर्व विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४. महालेखापाल१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
८. संचालक(माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क औरंगाबाद/नागपूर,
१०. सर्व विभागीय उपसंचालक (माहिती) माहिती व जनसंपर्क
११. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
१२. मा. राज्यमंत्री (सा.प्र.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४. लेखाधिकारी (आहरण व संवितरण) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५. नियोजन विभाग/का-१४४३, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग/का-व्यय-४, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती/का-३४